शारीरिकदृष्ट्या अपंग व्यक्तींना शासकीय सेवेत असलेल्या ३ टक्के आरक्षणाबाबतचा अनुशेष भरुन काढण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही-१०८६/३५२७/सीआर-२७/८७/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक १६ जुलै, १९८७.

वाचा :- [१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०७७/३५५६/१४३३/१६-अ, दिनांक २३ मे १९७८.
[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८१/३२७३/१६-अ, दिनांक १० सप्टेंबर १९८१.
[३] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८१/सीआर-१५/१६-अ, दिनांक ७ सप्टेंबर १९८२.
[४] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८२/३७५२/सीआर-८९/१६-अ, दिनांक १० नोव्हेंबर १९८२.
[५] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८५/२८७७/सीआर-९५/१६-अ, दिनांक २२ जानेवारी १९८६.
[६] शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८६/१२०५/सीआर-६२/१६-अ, दिनांक १९. ९. १९८६
[७] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-एसआरव्ही-१०८७/0/सीआर-२/१६-अ, दिनांक ६. ४. १९८७.

शासन परिपत्रक :- शारीरिकदृष्ट्या अपंग व्यक्तींना मुके, बहिरे व अंध धरुन, शासकीय सेवेत वर्ग ३ व वर्ग ४ मध्ये एकूण ३ टक्के विहित आरक्षणानुसार पदे राखून ठेवून शासकीय सेवेत भरती करण्याच्यादृष्टीने व अनुशेष भरुन काढण्याच्यादृष्टीने उपरोक्त आदेश शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आहेत. विशेषत: २२ जानेवारी १९८६ च्या आदेशानुसार दिनांक ३१ मार्च ८६ पूर्वी सर्व पात्र अपंगांना त्यांच्यासाठी राखून ठेवलेली पदे देण्यासंबंधीचा आदेश काढल्यानंतर देखील शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, अजूनही विहित आरक्षणानुसार अपंगांची पदे भरली जात नाहीत व त्यासंदर्भात अनुशेषसुध्दा बाकी आहे.

२. शारीरिकदृष्ट्या अपंगांकरिता विहित आरक्षणानुसार पदे भरण्यासंबंधी व अनुशेष भरुन काढण्यासंबंधी मुख्यमंत्र्यांनी अलिकडे असे निदेशित केले आहे की, या आदेशांची अंमलबजावणी होते किंवा नाही याचा आढावा घेऊन त्यावर संनियंत्रण ठेवले पाहिजे व त्याकरिता विभागीय आयुक्तांनी व सचिव [सेवा] सामान्य प्रशासन विभाग यांनी याबाबतीत संनियंत्रण ठेवावे. म्हणून सर्व विभागीय आयुक्तांना अशी विनंती करण्यात येत आहे की, त्यांच्या विभागातील जिल्हाधिकाऱ्यांना त्वरित आढावा घेण्यास सांगून त्या आढाव्याच्या आधारे शक्य होईल तितकी व आवश्यक असेल तेथे

[कृ. मा. प. ]

शामसु. रोटा/साप्रवि. /एच-४६१[४०००-७-८७]

प्रत्यक्ष पहाणी/तपासणी करुन शारीरिकदृष्टया अपंगांची आरक्षणानुसार भरती होते किंवा नाही यावर विभागीय आयुक्तांनी संनियंत्रण ठेवावे.

३. सचिव [सेवा] सामान्य प्रशासन विभाग यांना संनियंत्रण ठेवण्यात सोयीचे व्हावे म्हणून अशी विनंती करण्यात येत आहे की, मंत्रालयीन विभागांच्या सर्व सचिवांनी खुद्द मंत्रालयीन विभागात व विभागाच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांचे कार्यालयात अपंगांची आरक्षणानुसार सेवा भरती केली जाते की नाही हे पडताळून पाहण्यासाठी सर्व सचिवांनी आढावा घेऊन सचिव [सेवा], सामान्य प्रशासन विभाग यांना दिनांक ३१ ऑगस्ट १९८७ पूर्वी कळवावे. ह्याकरिता मंत्रालयीन विभागांच्या सचिवांनी काही प्रमाणात प्रत्यक्ष पाहणी/तपासणी करावी अशी त्यांना विनंती करण्यात येत आहे. सचिव [सेवा], सामान्य प्रशासन विभाग काही मंत्रालयीन विभागांची चाचणी पाहणी करुन अपंगांचे आरक्षण किती प्रमाणात आहे व अनुशेष किती आहे याचे स्वतः परीक्षण करतील.

४. अपंगांच्या विशेषतः अंधांच्या सेवाभरतीला केन्द्रीय समाज कल्याण मंत्र्यांनी व पंतप्रधानांनी पण महत्व दिलेले आहे हे ध्यानात ठेवून सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी व विभाग प्रमुखांनी/कार्यालय प्रमुखांनी ह्या विषयी जातीने लक्ष घालून आरक्षणानुसार अपंग व अंधांच्या बाबतीतील अनुशेष लवकरात लवकर भरला जाईल ह्याची काळजी घ्यावी.

अशोक बसाक,
सचिव [सेवा] महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ शाखा], मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
संचालक, सेवायोजन, मुंबई
सर्व मंत्री, राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
सचिव, मंत्रालयाचे सर्व विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १२, १३-अ, १४-अ, १६-ब,
मंत्रालयीन सर्व विभाग,
निवड नस्ती.

* पत्राने

---

एच-४६९[४०००-७-८७]